तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थेचे आधुनिकीकरण करणे या योजनेंतर्गत सुरक्षा उपकरणांच्या खरेदीस प्रशासकीय मंजूरी व खर्चास मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांक: जेएलएम-०२२१/प्र.क्र.२३/तुरुंग-२,

दुसरा मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-३२,
दिनांक: २५ फेब्रुवारी, २०२२.

वाचा-

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.६.२०२१,
२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.८.२०१७.
३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस २०१७/प्र.क्र.२०४/ उद्योग-४, दिनांक ८.१२.२०१७.
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. इप्रवि/मेंन्टेंनन्स/सुरक्षा उपकरणे/२०२१-२२/क-६/१०३६, पुणे, दिनांक ०७/०२/२०२२.

प्रस्तावना:

महाराष्ट्रातील कारागृहाच्या आतील परिसर तथा शेती परिसर मोठा असून सर्व परिसरावंर देखरेख करण्याकरिता आवश्यक सी.सी.टी.व्ही. यंत्रणा उभारण्यास काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. त्यामुळे कारागृहातील अंतर्गत सुरक्षेकरीता कर्तव्यावरील सर्व अधिकारी/कर्मचा-यांचा एकमेकांशी तात्काळ संपर्क होणे गरजेचे आहे. सदर संपर्क स्थापन करण्याकरिता कारागृह विभागास वॉकीटॉकी संचाची आवश्यकता असून वॉकीटॉकी असल्यास कर्तव्यावर असलेल्या सर्व अधिकारी कर्मचा-यांना एकमेकांशी संपर्क साधून बंद्यांवर नियंत्रण मिळविणे, कोणतीही अनर्थकारी घटना टाळण्यास मदत व सुरक्षा व्यवस्था चोख ठेवता येईल. याकरिता जलद संवाद साधण्यासाठी वॉकी टॉकी संच खरेदी करणे आवश्यक आहे. या दृष्टीने अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये सुरक्षा उपकरणे (वॉकी टॉकी संच) खरेदी करण्याबाबत प्रस्ताव सादर केला आहे.

२. कोविड -१९ या संसर्गजन्य विषाणूमुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात होणा-या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना करण्याबाबत संदर्भीय क्र.१ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दिनांक २४.०६.२०२१ अन्वये **खरेदी** संदर्भात वित्त विभागाने निर्बंध घातले आहेत. तथापि, वित्त विभागाच्या मान्यतेने सदर शासन निर्णयातील खरेदी संदर्भातील निर्बंध व अटी/शर्ती शिथील करुन रु. ५,२३,९०,७४०/- इतक्या रकमेची सुरक्षा उपकरणे खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील कारागृहांतील सुरक्षा व्यवस्थेचे आधुनिकीकरण करणे, या योजनेतंर्गत **रु.५,२३,९०,७४०/- ( अक्षरी रुपये पाच कोटी तेवीस लक्ष नव्वद हजार सातशे चाळीस फक्त**) इतक्या रकमेची खालील नमूद तक्यातील सुरक्षा उपकरणे खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. (रक्कम रुपये)

| Digital Handheld Transceiver Set (HANDHELD RADIO) | | Digital Base / Mobile Transceiver Set ( MOBILE RADIO ) | | एकुण अंदाजित किंमत रु. |
|---|---|---|---|---|
| आवश्यक वॉकीटॉकी संख्या | प्रति नग रु.२१४९०/- प्रमाणे एकुण अंदाजित किंमत | आवश्यक संख्या | प्रति नग रु.३७१२०/- प्रमाणे एकूण अंदाजित किंमत | |
| २२९८ | ४,९३८४,०२०/- | ८१ | ३०,०६,७२०/- | रु.५,२३,९०,७४०/- |
| **(अक्षरी रुपये पाच कोटी तेवीस लाख नव्वद हजार सातशे चाळीस फक्त)** | | | | |

२. सदर खरेदी उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.८.२०१७ व उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस २०१७/ प्र.क्र.२०४/उद्योग-४, दिनांक ०८.१२.२०१७ मधील नमूद तरतुदींच्या अनुषंगाने विहित पध्दतीचा अवलंब करुन केली जाईल याची काटेकोरपणाने खात्री करावी.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम भाग-२, दिनांक १७.४.२०१५ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला उपविभाग दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटीस अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. यावरील होणारा खर्च “मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशिर्ष (२०५६) तुरुंग (००) (१०१) तुरुंग (००) (१८) तुरुंगातील सुरक्षा व्यवस्थेचे आधुनिकीकरण करणे (२०५६ ०२२२) योजनांतर्गत योजना ५२ (यंत्र सामुगी व साधन सामुग्री)” या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौसंदर्भ क्र.५८/२०२२/व्यय-८, दिनांक १५.२.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२२५१७१६२०४५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Seema Tushar Sawant

Digitally signed by Seema Tushar Sawant
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15a6230fe20fd947aa83047f5deb85c95659ceb098e76eb25dd802b0518e7d63, pseudonym=24B046C8F2B9180A5B4EF51135F7CE222B0A37F0, serialNumber=9ED89E6C00B3FD549E02FB85DFE0767F96018A29CCAC79EC62AAFD247DECECE8, cn=Seema Tushar Sawant
Date: 2022.02.28 15:36:47 +05'30'

**(सीमा तु. सावंत)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक (कारागृह व सुधारसेवा), महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह) दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई,
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग पुणे,
८. कारागृह उपमहानिरीक्षक मध्य विभाग, औरंगाबाद,
९. कारागृह उपमहानिरीक्षक पूर्व विभाग, नागपूर,
१०. उप सचिव, अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. वित्त विभाग, व्यय-८/अर्थ १२,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१३. निवड नस्ती तुरुंग-२

//****//